**प्रशासकीय मान्यता**

सन २०१७-१८ या वर्षात श्री. सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई अर्थसहाय्यित तसेच राज्य योजनांतर्गत अनुदानातून संस्थेकरिता यंत्र खरेदीस प्रशासकीय मान्यता.

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अकोला

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : जीसीए-२०१७/प्र.क्र.३५०/प्रशा-१**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक : २०.०३.२०२०

**वाचा :**

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
२) शासन निर्णय, विधी व न्याय विभाग, क्रमांक एसव्हीटी १११६/१५८/प्र.क्र.२१/ का.१६, दिनांक २०.०३.२०१७.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
४) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २६.०२.२०१८
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक संकीर्ण २०२०/ प्र.क्र.४/ २०/ कोषा.प्रशा.५, दिनांक ३०.०१.२०२०
६) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र. संवैशिवसं/यंसाख/ म/शावैमअकोला/३टेस्ला एम आर आय/प्रमा/१८१०/२०२०, दिनांक १८.०२.२०२०

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शासन निर्णय, दिनांक २६.०२.२०१८ अन्वये शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अकोला या संस्थेस श्री.सिध्दिविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई यांचेकडून मंजूर झालेल्या रुपये ५.०० कोटी व उर्वरीत निधी राज्य योजनातंर्गत उपलब्ध करून देण्याच्या अनुषंगाने रुपये ११,५२,००,०००/- (अक्षरी रुपये अकरा कोटी बावन्न लक्ष फक्त) इतक्या रकमेची एमआरआय ही यंत्रसामुग्री खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती.

याविषयी संचालनालयाने उपरोक्त दिनांक १८.०२.२०२० च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने सदर एमआरआय ३ टेस्ला विथ टर्न की प्रोजेक्ट ही यंत्रसामुग्री

खरेदी करण्यासाठी रुपये १५,९०,००,००० ( पंदरा कोटी नव्वद लक्ष फक्त ) इतक्या रकमेस खालील अटीच्या अधीन राहून खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**अटी :-**

१. याविषयी उपरोक्त शासन निर्णय समक्रमांक दिनांक २६.०२.२०१८ मध्ये नमूद किमती व्यतिरीक्त लागणरा निधी सदर संस्थेस पदव्युत्तर शिक्षण श्रेणीवर्धन या योजनेतंर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीतून उपलब्ध होणार आहे.
२. सदर प्रस्तावित यंत्रसामुग्रीसाठी केंद्र शासनाचा निधी अनुज्ञेय आहे याची खातरजमा संस्था व संचालनालायने केलेली आहे.
३. सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.
४. निधीच्या माध्यमानुसार उपरोक्त शासन परिपत्रक, वित्त विभाग,दिनांक ३०.०१.२०२० अन्वये आर्थिक वर्षाच्या अखेरीस खरेदीच्या प्रस्तावांबाबत करावयाच्या कार्यवाहीबाबतचे निर्बंध लागू होणार नाहीत.
५. शासन निर्णय, समक्रमांक दिनांक २६.०२.२०१८ मधील अन्य अटी कायम राहतील.

२. या प्रयोजनासाठी लागणार अतिरीक्त निधी या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एस ४

| | | |
|---|---|---|
| ४२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| ०३ | - | वैद्यकीय शिक्षण व प्रशिक्षण संशोधन |
| १०५ | - | विषमचिकित्सा |
| ०० | - | |
| (००) (४२) | - | राज्य शासकीय वैद्यक महाविद्यालयाचे बळकटीकरण व दर्जावाढ करणे व नवीन पदव्युत्तर पाठयक्रम सुरु करणे व पदव्युत्तर विद्यार्थ्यांच्या संख्येत वाढ करणे (४२१० २४३८) |
| ५२ | - | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री |

**३.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग-२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२०१४५५२८७४१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN MURLIDHAR RAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, postalCode=400032, street=MANTRALAYA ,MUMBAI, serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.03.20 18:24:57 +05'30'

( अ. मु. डहाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - २ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, नागपूर.
२. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो फार्मास्युटीकल्स् कॉर्पोरेशन लि., मुंबई.
४. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अकोला.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला.
६. कार्यासन अधिकारी (कोषा -प्रशा ५ ) , वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. कार्यासन अधिकारी (वैसेवा-२), वैद्यकीय शिक्षण आणि औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन अधिकारी (का.१६), विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (प्रशा-१)